नियतकालिक बदल्या-सन २०२०
**सहायक प्राध्यापक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी शिक्षक सेवा,गट -अ**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदल्या-२०२०/(प्र.क्र.६७/२०)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०७ ऑक्टोबर, २०२०

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-याच्या मान्यतेने सहायक प्राध्यापक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी शिक्षक सेवा, गट-अ या संवर्गातील अध्यापकांच्या बदल्या खालीलप्रमाणे करण्यात येत आहेत. बदलीनंतर संबंधित अध्यापकांची पदस्थापना त्यांच्या नावासमोरील स्तंभ - ३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अध्यापकाचे नाव,पदनाम व कार्यरत संस्था | बदलीचे ठिकाण | बदलीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.सी.एम.सेवतकर, सहायक प्राध्यापक,यंत्र अभियांत्रिकी शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,अवसरी | अभियांत्रिकी महाविद्यालय,पुणे | विनंती बदली |
| २. | डॉ. राजू नारायणराव लध्वे, सहायक प्राध्यापक,यंत्र अभियांत्रिकी शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद | अभियांत्रिकी महाविद्यालय,पुणे | विनंती बदली |

२. सदर बदली आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. उपरोक्त प्रमाणे विनंती बदली झालेल्या अध्यापकांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

४. सदर बदली आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या अध्यापकांना संबंधित संस्था प्रमुखांनी / प्राचार्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. याबाबतचा

पाठपुरावा संबंधित विभागीय तंत्रशिक्षण सहसंचालक यांनी करावा. तसेच याबाबतचा कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्यात संचालक,तंत्रशिक्षण यांचेमार्फत शासनास सादर करावा.

५. बदली झालेल्या अध्यापकाने अनधिकृत रजेवर जाऊ नये. तसेच संबंधिताने बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००७१३४१३५२४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman
Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2020.10.07 13:52:57 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अध्यापक (संस्था प्रमुखामार्फत)

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
२) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
३) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
४) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय,पुणे/औरंगाबाद (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
६) प्राचार्य/संचालक,शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय पुणे/अवसरी/औरंगाबाद (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षक) मुंबई / नागपूर, महाराष्ट्र १ /२.
८) अपर मुख्य सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
१०) निवड नस्ती - तांशि -१.